माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दिनांक ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत ---

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२१/प्र.क्र.१४३/२१/टीएनटी-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २८ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-**
१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१ डिसेंबर,२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय बीबीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि. ३० जून, २०२०
३) विभागीय शिक्षण उपसंचालक, लातूर विभाग, लातूर यांचे पत्र दि.०१.०२.२०२४ आणि दि १२.०३.२०२४ चे पत्र

**प्रस्तावना:**

माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन ॲण्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दिनांक ०६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र. ३१४०/२००८ मध्ये दिनांक २८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दिनांक ३१.१२.२०१९ पर्यत कार्यवाही करण्याचे आदेश दिले आहेत. मा. उच्च न्यायालयाचे सदर आदेश विचारात घेता. मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.१२.२०१९ रोजी निर्गमित शासन निर्णयातील तरतूदीनुसार अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या या विभागाच्या अधिपत्याखालील अनुदानित शाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकांमध्ये दि. ०६. जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या शिक्षक/शिक्षकेतर संवर्गातील, संबंधित शिक्षणाधिकारी यांनी १००% अनुदानित शाळेतील १००% अनुदानित पदावरील कर्मचारी असल्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केलेल्या खालील विवरण पत्रामध्ये नमूद एकूण ५ कर्मचाऱ्यांकरिता ११ महिन्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नांव व संस्थेचे नांव | सध्याचे पदनाम | मूळ नियुक्ती दिनांक | वैयक्तीक मान्यतेचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १. | श्री मेडेबने गोविंद नरसिंग<br>कॅप्टन जोशी स्मारक विद्यालय येणेगूर ता उमरगा जि. धाराशिव | सहशिक्षक गट क | दि.०१/०७/१९९८ | दि.२६.१०.१९९८ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २. | श्री रायजादे अंकुश नामदेव<br>शारदा विद्यानिकेतन सारोळा ता जि धाराशिव | सहशिक्षक गट क | दि.०५.०७.१९९९ | दि.०५.०७.२००१ |
| ३. | श्री जमादार बालाजी विश्वंभर जगदंबा विद्यालय खामसवाडी ता कळंब जि धाराशिव | सेवक गट ड | दि. १४.०२.२००० | दि.१४.०२.२००२ |
| ४. | श्री अणचे अमोगसिध्द इरप्पा कॅप्टन जोशी स्मारक विद्यालय, येणेगुर ता उमरगा जि धाराशिव | सेवक गट ड | दि.०१.०४.१९९८ | दि.०१.०४.२००० |
| ५. | श्री बारापात्रे ज्ञानेश्वर मारोती<br>श्री सुभाष विद्यालय गोकुल गोंडेगांव ता माहूर<br>जि नांदेड | सहशिक्षक | दि.०६.०८.२००१ | दि.१९.१०.२००४ |

२. अनुसचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याच्या कारणास्तव अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणाऱ्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते, त्या दिनांकापर्यत यापैकी जे आधी घडेल तो पर्यत अधिसंख्य पदावर नेमणूक देण्यात येत आहे.

३. उपरोक्त नमूद विवरणपत्रातील कर्मचाऱ्यांच्या संबंधित नियुक्ती प्राधिकारी म्हणजेच संबंधित शिक्षणाधिकारी यांनी, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २१ डिसेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट क आणि परिशिष्ट ड मधील नमून्यानुसार केवळ वैयक्तिक मान्यताप्राप्त/स्थायी कर्मचाऱ्यांकरिता नियुक्ती आदेश तात्काळ निर्गमित करुन त्यांची सेवा तातडीने अधिसंख्य पदावर वर्ग करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. उपरोक्त नमूद विवरणपत्रातील कर्मचाऱ्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यापूर्वी त्यांना जेवढे मासिक वेतन व भत्ते मिळत होते. तेवढे वेतन व भत्ते त्यांना पुढील आदेश होईपर्यत देय राहतील.

५. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८२८१६२५२५४६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.08.28 16:40:20 +05'30'

**( तुषार महाजन )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
३. मा. उपमुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक
५. मा. मुख्यसचिव यांचे स्वीय सहाय्यक
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. महालेखापाल -१( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. महालेखापाल -१( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. महालेखापाल -२( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३. महालेखापाल -२( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१४. शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. संचालक माहिती व जन संपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१७. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
१८. सर्व शिक्षणाधिकारी प्राथमिक/माध्यमिक
१९. सर्व मुख्याधिकारी नगरपालिका/नगर परिषद
२०. सर्व प्रशासन अधिकारी नगर परिषद कटक मंडळे
२१. शिक्षण निरीक्षक (पश्चिम/दक्षिण/उत्तर), बृहन्मुंबई
२२. निवडनस्ती (टीएनटी-२ कार्यासन)